**कांबळगांव, जि.पालघर व मुंढेगाव, जि. नाशिक येथे मध्यवर्ती स्वयंपाकगृह (Centralized Kitchen) सुरु करणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाआशा-२०१५/प्र.क्र.१००/का.१३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २९ जुलै, २०१५

**प्रस्तावना:-**

आदिवासी विकास विभागांतर्गत सध्या ५२८ शासकीय आश्रमशाळेतील सुमारे २ लाख विद्यार्थी तसेच ४९० शासकीय वसतीगृहात जवळपास ५५ हजार विद्यार्थ्यांना शासनामार्फत जेवणाची व्यवस्था करण्यात येते. शासकीय आश्रमशाळेत स्वयंपाकी, कामाठी यांच्या मदतीने जेवण तयार करतात. त्यासाठी आवश्यक अन्नधान्य,कडधान्य व इतर किराणा माल याचा शासनाकडून एकाधिकार योजनेखाली खरेदी केलेल्या मालातून व उर्वरित ई निविदेद्वारे खरेदी करून पुरवठा करण्यात येतो. तर वसतीगृहांमध्ये भोजन ठेकेदारामार्फत जेवणाची व्यवस्था करण्यात आलेली आहे.

२. वरीलप्रमाणे शासनाने विद्यार्थ्यांच्या भोजनासाठी व्यवस्था केलेली असली तरी, विद्यार्थ्यांना चांगल्या प्रतीचे पुरेसे, आरोग्यदायी व सकस जेवण मिळत नसल्याबाबत तक्रारी येतात. शासन विद्यार्थ्यांना सकस व पुरेसे जेवण देण्यासाठी प्रयत्न करते, परंतु विद्यार्थ्यांना सकस व पुरेसे भोजन देण्यात स्थानिक पातळीवर अडचणी येतात. याबाबी विचारात घेऊन काही चांगल्या नामांकीत स्वयंसेवी संस्थांच्या सहकार्याने यामध्ये सुधारणा करण्यासाठी मध्यवर्ती स्वयंपाकगृह उभारता येईल किंवा कसे याबाबत विभागामार्फत प्रयत्न करण्यात आले. या संदर्भात सर दोराबजी ट्रस्ट व संलग्न ट्रस्ट, सर रतन टाटा आणि नवाजीभाई रतन टाटा ट्रस्ट मार्फत अक्षय पात्रा फाउंडेशन या संस्थेने आश्रमशाळेतील मुलांसाठी पोषक व चांगले अन्न पुरविण्यासाठी विभागास सहकार्य करण्याची तयारी दर्शविली आहे. याबाबत ट्रस्टचे प्रतिनिधी, अक्षय पात्रा फाउंडेशन, शासन तसेच युनिसेफचे प्रतिनिधी यांचेबरोबर पाच-सहा बैठका झाल्या. तसेच दि. १०.०६.२०१५ रोजी राज्य शासन, टाटा ट्रस्ट व अक्षय पात्रा फाउंडेशन यांच्यात सामंजस्य करार (Memorandum of Understanding) करण्यात आलेला आहे. त्यास अनुसरून यावर्षी १ ऑगस्ट २०१५ पासून नाशिक जिल्हयातील मुंढेगाव येथे तर १५ ऑगस्ट २०१५ पासून ठाणे जिल्हयातील कांबळगाव येथे मध्यवर्ती स्वयंपाकगृह स्थापन करून प्रत्यक्षात सुरू करण्यासाठी, त्याची अंमलबजावणी व नियमित कामकाज पार पाडण्यासंदर्भात कार्यपद्धती विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना पौष्टीक व चांगला नास्टा, दोन वेळचे जेवण व अल्पोपहार पुरविण्यासाठी कांबळगांव, जि. पालघर व मुंढेगाव, जि. नाशिक येथे टाटा ट्रस्ट व अक्षय पात्रा फाउंडेशनच्या सहकार्याने मध्यवर्ती स्वयंपाकगृह( Centralized Kitchen) सुरू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

## २. अंमलबजावणीची कार्यपद्धती:

१) कांबळगांव जि. पालघर व मुंढेगाव, जि. नाशिक येथे अद्ययावत मध्यवर्ती स्वयंपाकगृह, टाटा ट्रस्ट व अक्षयपात्रा फाउंडेशनच्या सहकार्याने आदिवासी विकास विभागामार्फत उभारण्यात येईल.

२) कांबळगाव जि. पालघर येथे एका वेळी २०००० व्यक्तींसाठी जेवण बनविण्याची क्षमता असलेले अद्ययावत स्वयंपाकगृह उभारण्यात येईल. या परिसरात असलेल्या १२ आश्रमशाळा तसेच ९ वसतीगृहांमधील सुमारे १२००० विद्यार्थ्यांचा मध्यवर्ती स्वयंपाकगृहामार्फत नास्टा/जेवण पुरविण्यासाठी सुरुवातीला समावेश करण्यात येईल. आवश्यकतेनुसार नवीन आश्रमशाळा/वसतीगृहांचा समावेश करणे/ वगळणे याबाबतचा निर्णय सदर प्रकरणी नेमण्यात आलेल्या सुकाणू समितीमार्फत घेण्यात येईल.

३) मुंढेगाव, जि. नाशिक येथेही एका वेळी २०००० जणांसाठी जेवण बनविण्याची क्षमता असलेले अद्ययावत स्वयंपाकगृह उभारण्यात येईल. या परिसरात असलेल्या १० आश्रमशाळा तसेच ४ वसतीगृहांमधील सुमारे ७००० विद्यार्थ्यांचा मध्यवर्ती स्वयंपाकगृहामार्फत नास्टा/जेवण पुरविण्यासाठी सुरुवातीला समावेश करण्यात येईल. आवश्यकतेनुसार नवीन आश्रमशाळा/वसतीगृहांचा समावेश करणे/ वगळणे याबाबतचा निर्णय सदर प्रकरणी नेमण्यात आलेल्या सुकाणू समितीमार्फत घेण्यात येईल.

४) कांबळगांव जि.पालघर येथे अद्ययावत स्वयंपाकगृहांच्या उभारणीसाठी एकलव्य निवासी आश्रमशाळा, कांबळगांव येथील उपलब्ध असलेली जागा आदिवासी विकास विभागामार्फत उपलब्ध करून देण्यात येईल.

५) मुंढेगांव जि.नाशिक येथे अद्ययावत स्वयंपाकगृहांच्या उभारणीसाठी इंग्रजी माध्यमाची आश्रमशाळा, मुंढेगाव येथील उपलब्ध असलेली जागा आदिवासी विकास विभागामार्फत उपलब्ध करून देण्यात येईल.

६) वरील दोन्ही ठिकाणी मध्यवर्ती स्वयंपाकगृह उभारणे, पाणी पुरवठा, पाणी साठवण, सांडपाणी व्यवस्थापन व पर्यावरण संगोपनासाठी आदिवासी विकास विभागाच्या वतीने टाटा ट्रस्ट ला परवानगी देण्यात येईल.

७) अक्षय पात्रा फाउंडेशन, यासाठी ५ वर्षापर्यंत तांत्रिक सहकार्य आदिवासी विकास विभागास उपलब्ध करून देईल. त्यानंतर आदिवासी विकास विभाग स्वतंत्रपणे मध्यवर्ती स्वयंपाकगृह चालवेल.

८) दोन्ही मध्यवर्ती स्वयंपाकगृहासाठी वर्ग-२ चा नियंत्रण अधिकारी आदिवासी विकास विभागामार्फत नेमण्यात येईल. सदर नियंत्रण अधिकारी सहायक प्रकल्प अधिकारी या पदाच्या दर्जापेक्षा कमी दर्जाचा नसेल. नियंत्रण अधिका-याच्या नेमणूकीची कार्यवाही संबंधीत अपर

आयुक्त करतील. सदर नियंत्रण अधिकारी आयुक्त, आदिवासी विकास यांचे थेट नियंत्रणाखाली राहील. दररोजच्या कामकाजासाठी तो जबाबदार राहील.

९) मध्यवर्ती स्वयंपाकगृहांमध्ये नास्टा, दोन वेळचे जेवण व अल्पोपहार तयार करून ते कांबळगांव जि.पालघर तसेच मुंढेगांव जि. नाशिक पासून ४० कि.मी. अंतरापर्यंतच्या शासकीय आश्रमशाळा/इंग्रजी माध्यमाच्या आश्रमशाळा/वसतीगृहे यातील विद्यार्थ्यांना खास वाहनाने निर्धारीत वेळेत पुरविण्यात येईल.

१०) मध्यवर्ती स्वयंपाकगृहांसाठी आवश्यक असणारे स्वयंपाकी व कामाठी आदिवासी विकास विभागात कार्यरत असलेल्या लाभार्थी शाळांमधून उपलब्ध करून देण्यात येतील.

११) प्रस्तावित मध्यवर्ती स्वयंपाकगृहाच्या लाभक्षेत्रातील उपलब्ध असलेल्या सर्व स्वयंपाकी व कामाठी यांना अक्षय पात्रा फाउंडेशन मार्फत एक आठवड्याचे प्रशिक्षण देण्यात येईल व त्यामधून कार्यक्षम स्वयंपाकी व कामाठी यांची मध्यवर्ती स्वयंपाकगृहात काम करण्यासाठी निवड करण्यात येईल.

१२) मध्यवर्ती स्वयंपाकगृहातील कर्मचा-यांना तीन पाळ्यांमध्ये ( Shift) काम करावे लागेल. प्रत्येक पाळीमध्ये ८ तास काम राहील. पहिली पाळी सकाळी ६ ते दुपारी २ वाजेपर्यंत, दुसरी पाळी दुपारी २ ते रात्री १० वाजेपर्यंत तर रात्रपाळी रात्री १० ते सकाळी ६ वाजेपर्यंत राहील.

१३) मध्यवर्ती स्वयंपाकगृहासाठी आदिवासी विकास महामंडळाकडून/सार्वजनिक वितरण प्रणालीकडून घ्यावयाचा गहू व तांदूळ यासाठी आदिवासी विकास विभागाकडून समन्वय करण्यात येईल.

१४) मध्यवर्ती स्वयंपाकगृहात तयार झालेले जेवण संबंधीत शाळेत पोहोचविण्यासाठी वाहनांची व्यवस्था टाटा ट्रस्ट कडून करण्यात येईल.

१५) मध्यवर्ती स्वयंपाकगृहात तयार झालेले दोन वेळेचे जेवण, नास्टा व अल्पोपहार संबंधीत आश्रमशाळेत पोहोचल्यानंतर त्याचे विद्यार्थ्यांना वाटप आदिवासी विकास विभागाच्या उपलब्ध कामाठी/स्वयंपाकी यांचेमार्फत करण्यात येईल.

१६) वसतीगृहातील विद्यार्थ्यांना जेवण पुरविणे व ते वसतीगृहात वाटप करणे याबाबत स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येईल.

१७) मध्यवर्ती स्वयंपाकगृहाच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांचे नास्ता, जेवण व अल्पोपहार याचे वेळापत्रक पुढीलप्रमाणे राहील.

| | नास्टा | दुपारचे जेवण | अल्पोपहार | रात्रीचे जेवण |
|---|---|---|---|---|
| आश्रमशाळा | सकाळी ७.३० | सकाळी १०.३० | दुपारी ३.३० | सायं.६.३० |

१८)मध्यवर्ती स्वयंपाकगृहामार्फत त्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना **परिशिष्ट-१** मधील मेनूत नमूद केल्याप्रमाणे नास्टा/जेवण देण्यात येईल.त्यात आवश्यकतेनुसार अक्षयपात्राच्या सहमतीने बदल करता येतील.

३. सुकाणू समिती ( Steering Committee)

अ) मध्यवर्ती स्वयंपाकगृहाची उभारणी करणे व त्याचे कामकाज सुरळीत चालण्याचे अनुषंगाने आवश्यक त्या उपाययोजना करण्यासाठी पुढीलप्रमाणे सुकाणू समिती गठित करण्यात येत आहे.

१) सचिव, आदिवासी विकास विभाग ---- अध्यक्ष

२) आयुक्त, आदिवासी विकास विभाग ---- सदस्य

३) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक ---- सदस्य

४) संबंधीत मध्यवर्ती स्वयंपाकगृहाचे नियंत्रक अधिकारी ---- सदस्य

५) टाटा ट्रस्ट्चा नामनिर्देशित प्रतिनिधी ---- सदस्य

६) अक्षय पात्राचे नामनिर्देशित प्रतिनिधी ---- सदस्य

७) संबंधित उप सचिव, आदिवासी विकास विभाग़, मंत्रालय ----सदस्य सचिव

वरील सुकाणु समितीची दर तीन महिन्यांनी अथवा समितीने ठरविलेल्या कालावधीत बैठक होईल.

**ब) सुकाणू समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील**

१) सदर कार्यक्रमाची उद्दिष्ट्ये निश्चित करणे.

२) निश्चित केलेली उद्दिष्ट्ये साध्य होण्याबाबत वेळोवेळी आढावा घेणे.

३) मध्यवर्ती स्वयंपाकगृहाच्या खर्चाचा सहामाही आढावा घेणे व त्याबाबत आवश्यक त्या उपाययोजना सुचविणे.

४) कांबळगांव व मुंढेगाव येथील मध्यवर्ती स्वयंपाकगृहाची उपयुक्तता विचारात घेऊन आदिवासी विकास विभागातील इतर ठिकाणी नव्याने मध्यवर्ती स्वयंपाकगृह उभारण्याबाबत निर्णय घेणे.

**४. संनियंत्रण समिती:-**

अ) मध्यवर्ती स्वयंपाकगृहाच्या दैनंदीन कामकाजाबाबत येणा-या अडचणी सोडवून दैनंदिन कामकाजावर नियंत्रण ठेवण्यासाठी पुढीलप्रमाणे संनियंत्रण समिती गठित करण्यात येत आहे.

१. आयुक्त, आदिवासी विकास विभाग ---- अध्यक्ष सदस्य

२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक ---- सदस्य

३. महाव्यवस्थापक, आदिवासी विकास महामंडळ ---- सदस्य

४. संबंधीत मध्यवर्ती स्वयंपाकगृहाचे नियंत्रक अधिकारी ---- सदस्य

५. संबंधित शाळेचे मुख्याध्यापक ---- सदस्य

६. संबंधीत प्रकल्प अधिकारी ---- सदस्य सचिव

वरील संनियंत्रण समितीची दर महिन्याला अथवा समितीने ठरविलेल्या कालावधीत बैठक होईल.

**ब) संनियंत्रण समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील**

१. मध्यवर्ती स्वयंपाकगृहाचे दैनंदीन कामकाज सुरळीत चालण्यासाठी उपाययोजना करणे

२. सुकाणू समितिपुढे ठेवण्याचे विषय निश्चित करणे

३. मध्यवर्ती स्वयंपाकगृहाच्या कामकाजाचा नियमीत आढावा घेणे.

क) मध्यवर्ती स्वयंपाकगृहाची संकल्पना राबवित असतांना काही वाद निर्माण झाल्यास सामंजस्य करारात (Memorandum of Understanding) नमूद केलेल्या अटी व शर्ती नुसार आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

**५. <u>आर्थिक बाबी:</u>**

१) कांबळगांव जि. पालघर तसेच मुंढेगांव जि. नाशिक येथील मध्यवर्ती स्वयंपाकगृह उभारणीचा सर्व भांडवली खर्च टाटा ट्रस्टच्या वतीने करण्यात येईल.

२) आश्रमशाळा/वसतीगृहातील विद्यार्थ्याच्या जेवणासाठी प्रतिविद्यार्थी/प्रतिमहिना रुपये १९९७/- एवढी रक्कम देण्यात येईल. अन्नधान्य, किराणा, भाजीपाला व इंधन यांची भाववाढ व इतर बाबी विचारात घेऊन सदर रकमेत वाढ करण्याबाबत सुकाणू समिती वेळोवेळी आढावा घेऊन निर्णय घेईल.

३) कांबळगांव जि. पालघर व मुंढेगांव जि. नाशिक येथील मध्यवर्ती स्वयंपाकगृहांच्या नावे तेथील बँकेत स्वतंत्र खाते उघडण्यात येईल. बँक खाते उघडण्याची कार्यवाही संबंधित नियंत्रण अधिका-याने त्वरीत करावी. सदर खात्यावरील आर्थिक व्यवहार नियंत्रण अधिकारी व अक्षयपात्राचे प्रतिनिधी यांचे संयुक्त स्वाक्षरीने करण्यात येतील.

४) आश्रमशाळा/वसतीगृहातील विद्यार्थ्याच्या जेवणासाठी प्रति विद्यार्थी/प्रति महिना रुपये १९९७/- याप्रमाणे तीन महिन्याची आगावू रक्कम आदिवासी विकास विभागामार्फत मध्यवर्ती स्वयंपाकगृहासाठी असलेल्या बँक खात्यावर जमा करण्यात येईल. ही कार्यवाही आयुक्त, आदिवासी विकास यांनी करावी.

५) मध्यवर्ती स्वयंपाकगृहातील कर्मचा-यांना तीन पाळ्यांमध्ये काम करावे लागेल. रात्रपाळीत काम करणा-या अधिकारी/कर्मचारी यांना रात्रपाळी भत्ता (Night Shift Allowance) सुकाणू समितीने ठरवून दिलेल्या दराने अनुज्ञेय राहील.

६) जर एखाद्या कर्मचा-यास एकाच दिवशी एकापेक्षा जास्त पाळीमध्ये काम करावे लागत असेल तर त्या कर्मचा-यास अतिकालीक भत्ता ( Overtime Allowance) सुकाणु समितीने ठरवून दिलेल्या दराने अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७३०१५२७११४०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2015.07.30 15:29:43 +05'30'

**( सु. ना. शिंदे)**
उप सचिव, आदिवासी विकास विभाग

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मंत्री आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव.
४) सचिव ( आदिवासी विकास विभाग ) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६) अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर
७) सर्व संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिकआदिवासी विकास प्रकल्प.
८) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई.
९) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
१०) सर्व निवासी लेखा परिक्षा अधिकारी.
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१२) सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवड नस्ती (का. १३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) युनिसेफ महाराष्ट्राचे प्रतिनिधी, अंधेरी, मुंबई - ४०० ०९३.

शासन निर्णय क्रमांकः शाआशा-२०१५/प्र.क्र.१००/का.१३, दि. २९ जुलै, २०१५ सोबतचे

## परिशिष्ट-१

मध्यवर्ती स्वयंपाकगृहामार्फत त्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा व वसतीगृहातील विद्यार्थ्यांना द्यावयाचा नास्ता/जेवण याचा तपशील (MENU).

| | नास्ता | दुपारचे जेवण | अल्पोपहार | रात्रीचे जेवण |
|---|---|---|---|---|
| **सोमवार** | फळ व उकडलेले अंडे | चपाती, दाळ, भात | साबुदाना वडा, चटनी | आलू पराठा, मिक्स व्हेज, व्हेज पुलाव |
| **मंगळवार** | फळ व उकडलेले अंडे | चपाती, चना मसाला/मिक्स वेज ग्रेव्ही, वाटाणा पुलाव | भजे | व्हेज अँड दाल खिचडी, चपाती, भाजी, टोमॅटो लोनचे |
| **बुधवार** | केळी व सुगंधी दूध आणि उकडलेले अंडे | चपाती, भात, मिक्स दाळ, भाताची खीर | समोसा, चटनी | चपाती, भाजी, भात, कढी |
| **गुरूवार** | फळ व उकडलेले अंडे | चपाती, भात, वेज अँड सोया नगेट ग्रेव्ही | मसाला बन/कचोरी | चपाती, मिक्सड लेन्टील्स दाल, पुलाव |
| **शुक्रवार** | केळी व सुगंधी दूध आणि उकडलेले अंडे | चपाती, भात, दाळ/सांबर, दही/कढी | भुजीया शेव, बुंदी | व्हेज व दाल खिचडी, चपाती, भाजी, टोमॅटो लोनचे |
| **शनिवार** | फळ व उकडलेले अंडे | चपाती, दाळ खिचडी, वेज अँड सोया नगेट ग्रेव्ही | पोहा | आलू पराठा, मिक्स व्हेज, व्हेज पुलाव |
| **रविवार** | केळी व सुगंधी दूध आणि उकडलेले अंडे | चपाती, वेजीटेबल ग्रेव्ही, नॉन वेज पुलाव (महिण्यात दोनदा)/वेज पुलाव, रायता | वडा पाव, लसून मसाला | व्हेज अँड दाल खिचडी, लोनचे, बर्फी/ड्राय स्विट |